राज्य अन्न आयोग, मुंबई कार्यालयातील अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि. ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र.: अस्थायी-२९२४/प्र.क्र.१३४/ना.पु.१५,**
मंत्रालय , मुंबई ४०० ०३२.
दिनांक २४ मार्च, २०२५.

**संदर्भ :-**१) शासन निर्णय, अ.ना.पु.व ग्रा.सं.वि, क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१५६/ना.पु.१२, दि.१८.०४.२०२२.
२) शासन निर्णय, अ.ना.पु.व ग्रा.सं.वि, क्र. अस्थायी -२९२४/प्र.क्र.१३४/ना.पु.१५, दि.२७.०९.२०२४.
३) शासन निर्णय, अ.ना. पु. व ग्रा.सं.वि, क्र.आस्थाप्र-१८२२/प्र.क्र.७२/ना.पु.१२, दि.०४.१२.२०२४
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५.
५) सचिव, राज्य अन्न आयोग यांचे पत्र क्र.राअआ-२०२२/संकीर्ण/प्र.क्र.४७/३९, दि.१०.०३.२०२५.

**प्रस्तावना :**

संदर्भ क्र.१ येथील दि.१८.०४.२०२२ च्या शासन निर्णयान्वये विभागाचा सुधारित आकृतीबंध मंजूर करण्यात आला असून त्यानुसार राज्य अन्न आयोग, मुंबई या कार्यालयासाठी **नियमित ०९ पदे** व **बाह्यस्त्रोताद्वारे ०२** पदे मंजूर करण्यात आली असून सदरची पदे अस्थायी आहेत. परिणामस्वरूप सेवार्थ प्रणालीमध्ये सदरची पदे अस्थायी पदे म्हणून दर्शविण्यात आली आहे.

संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये राज्य अन्न आयोग, मुंबई या कार्यालयातील एकूण **०९** अस्थायी पदांना, दि.०१.०९.२०२४ ते दि. २८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

राज्य अन्न आयोग, मुंबई या कार्यालयासाठी शिपाई संवर्गातील बाह्यस्त्रोताद्वारे मंजूर असलेली ०२ पदे संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये समायोजनाने भरण्यात आलेली आहेत.

संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना पदांना **दि. ०१.०३.२०२५ ते दि. ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ** देण्याचे अधिकार प्रदान केलेले आहेत. त्यानुसार राज्य अन्न आयोग, मुंबई या कार्यालयातील **एकूण ११ अस्थायी** पदांना **दि. ०१.०३.२०२५ ते दि. ३१.०८.२०२५ पर्यंत** मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्य अन्न आयोग, मुंबई या कार्यालयातील खालील पदांची आवश्यकता विचारात घेऊन, सदरची पदे सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीपासून रिक्त नाहीत या अटीच्या अधीन राहून **दि. ०१.०३.२०२५ ते दि. ३१.०८.२०२५ पर्यंत** पुढे चालू ठेवण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **पदनाम** | **मुदतवाढ द्यावयाची अस्थायी पदे** |
|---|---|---|
| १. | सचिव | १ |
| २. | विधी अधिकारी | १ |
| ३. | लेखाधिकारी | १ |
| ४. | लघुलेखक (उच्चश्रेणी) | १ |
| ५. | लघुलेखक (निम्नश्रेणी) | १ |
| ६. | वरिष्ठ लिपिक | २ |
| ७. | लिपिक टंकलेखक | २ |
| ८ | शिपाई | २ |
| एकूण | | ११ |

२. उपरोक्त ११ अस्थायी पदांवरील खर्च संबंधित वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व तो " मागणी क्र.एम-२, २४०८-अन्न साठवण व वखार साठवण, १०१ प्रापण व पुरवठा, (०२) शिधावाटप (०२) (०१) मुंबई शिधावाटप क्षेत्र, दत्तमत (२४०८००६४) ०१, वेतन " या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग,शासन निर्णय,क्र.:पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.३.३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२४१७५१३०९४०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

POOJA PRASAD MANKAR

Digitally signed by POOJA PRASAD MANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT,
2.5.4.20=2587c101141ff0822d1f39f866ca3537dfc0e52728f898604a75ff77b46e7415, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3063036B7F64E995ED6A8BC7C9FBB1A5A10E6562F73D65107AD668D006B3B164, cn=POOJA PRASAD MANKAR
Date: 2025.03.24 17:52:50 +05'30'

**(पूजा मानकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सचिव, राज्य अन्न आयोग, मुंबई.
२) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई.
३) महालेखापाल -१/२, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६) वित्त विभाग (व्यय -४), मंत्रालय, मुंबई.
७) वित्त विभाग (अर्थसंकल्प १९), मंत्रालय, मुंबई.
१०) निवड नस्ती(ना.पु.१५).